**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - पाणलोट विकास घटक २.० या योजनेसाठी SNA-SPARSH ही प्रणाली लागू करण्यासाठी केंद्र शासनाने Mother Sanction मंजूर केलेला केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा निधीचे वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : केंपुयो-२०२५/प्र.क्र.६५ (E-१०८८८७९)/जल-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : १९ मे, २०२५

**वाचा :**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५,
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ-३, दि.०८.०१.२०२५,
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८८/अर्थ-३, दि.१५.१०.२०२४,
४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५१/कोषा-प्रशा-४, दि.१०.१०.२०२४,
५. शासन निर्णय, मृद व जलसंधारण विभाग क्र.केंपुयो-२०२५/प्र.क्र.६३ (e-१०८२०६०)/जल-८, दि.१७.०४.२०२५,
६. शासन निर्णय, मृद व जलसंधारण विभाग क्र.केंपुयो-२०२४/प्र.क्र.१२६/जल-८, दि.२९.१०.२०२४,
७. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.के ११०११/१३/२०२२ WDC २.०/ Maharashtra(e-३०११९०८) दि.१५.०४.२०२५.

**प्रस्तावना :**

केंद्रीय भूसंसाधन विभाग, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचेमार्फत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - पाणलोट विकास घटक २.० या प्रकल्पाकरिता सामाईक मार्गदर्शक सूचना २०२१ निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार राज्यात प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना-पाणलोट विकास घटक २.० ही योजना राबविण्यास दि.२७.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर योजनेच्या केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण ६०:४० असून केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र. ७ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये **अनुसूचित जाती विशेष घटक योजना** घटकांतर्गत रु.८६९.०० लक्ष इतक्या केंद्र हिस्सा निधीस १ ली Mother Sanction दिली आहे. त्यास अनुसरून केंद्र हिस्सा निधी व त्यास समरुप ४०% राज्य हिस्सा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना – पाणलोट विकास घटक २.० या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता मागणी क्र.एन-५ (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) - अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना अंतर्गत केंद्र हिस्स्यापोटी (६०%)(४४०२२८८८) रु.८६९.०० लक्ष (रुपये आठ कोटी एकोणसत्तर

लक्ष फक्त) व राज्य हिस्स्यापोटी (४४०२२८९७) (४०%) रु.५७९.३३ लक्ष (रुपये पाच कोटी एकोणऐंशी लक्ष तेहतीस हजार फक्त) असा मिळून रु.१४४८.३३ लक्ष (रुपये चौदा कोटी अठ्ठेचाळीस लक्ष तेहतीस हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खर्च करण्यासाठी गुण नियंत्रण व दक्षता मंडळ, पुणे या कार्यालयातील सहाय्यक गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून, तर मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रण अधिकारी यांनी ताबडतोब उक्त निधी SNA-SPARSH प्रणालीवर कार्यान्वित करुन घ्यावा.

४. वरील निधीचा विनियोग करतांना केंद्र सरकारचे वित्त मंत्रालय, ग्रामीण विकास मंत्रालय, तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे व अटी-शर्तीचे अनुपालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदरचा खर्च पुढील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग - मागणी क्र. एन-५**
४४०२ – मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च
(००),
(७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना
(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना
(०१)(०१) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना – एकात्मिक पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन कार्यक्रम (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) (४४०२२८८८)
५३, मोठी बांधकामे

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग - मागणी क्र. एन-५**
४४०२ – मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च
(००),
(७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना
(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना
(०१)(०२) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना – एकात्मिक पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन कार्यक्रम (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) (४४०२२८९७)
५३, मोठी बांधकामे

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे यांनी वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे आवश्यक त्या माहितीसह केंद्र व राज्य शासनाकडे निर्धारित कालावधीमध्ये सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५, शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८८/अर्थ-३, दि.१५.१०.२०२४ व शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ-३, दि.०८.०१.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५१९१०१९४२२०२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVI SHIVAJI VHATKAR

Digitally signed by RAVI SHIVAJI VHATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=bca9a9d38f4447074d53ffd7129d6c978023dfe76311c98a4ffd7de9447d9bb9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=85AD116139ECB1182DD7FBEF85E39485778BB2D61F5A53C998FFD46129875C23, cn=RAVI SHIVAJI VHATKAR
Date: 2025.05.19 10:21:52 +05'30'

**( र. शि. व्हटकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा. मंत्री, मृद व जलसंधारण यांचे खाजगी सचिव,
५) मा. राज्यमंत्री, मृद व जलसंधारण यांचे खाजगी सचिव,
६) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,
७) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
८) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव,
९) आयुक्त, मृद व जलसंधारण, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर,
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे.
११) सर्व विभागीय आयुक्त,
१२) महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), छत्रपती संभाजीनगर,
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (प्रसिद्धी करिता),
१४) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
१५) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१६) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१७) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर,
१८) सर्व जिल्हाधिकारी,
१९) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो),
२०) सर्व उपायुक्त (विकास),
२१) अपर मुख्य कार्यकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे,
२२) अपर आयुक्त (जलसंधारण), मृद व जलसंधारण विभाग, पुणे/ नागपूर,

२३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२४) सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी,
२५) सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी,
२६) सहाय्यक गुणनियंत्रण अधिकारी, गुण नियंत्रण व दक्षता मंडळ यांचे कार्यालय, मृद व जलसंधारण विभाग पुणे,
२७) महालेखापाल -१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर. (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
२८) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे / छत्रपती संभाजीनगर,
२९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३०) वित्त विभाग (व्यय-१५, अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई,
३१) वित्त विभाग (कोषा-प्रशा-४), मंत्रालय, मुंबई,
३२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
३३) मृद व जलसंधारण विभाग/जल-११, मंत्रालय, मुंबई
३४) जल-८ (निवडनस्ती).